GR- 200404101635070001-0100

**मुंबई व सुवर्ण त्रिकोण विकास या कामाचे नियोजन व अंमलबजावणी करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागात अधिकारी / कर्मचारी यांची जादा पदे निर्माण करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :आस्थापना ११०४/प्र.क्र.५/०४(पदे)/१९-अ**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १६ मार्च,२००४**

**संदर्भ :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. मुस २००३/२०/का.१, दि. १६/१०/२००३.**

**शासन निर्णय :**

मुंबई शहराला आगामी दशकात सर्वोत्तम शहराचा दर्जा प्राप्त करुन देण्यासाठी मुंबई व सुवर्ण त्रिकोण विकास या कामाचे नियोजन व अंमलबजावणी करण्यासाठी शासनाने संदर्भित शासन निर्णयान्वये एका कार्यबलाची (Task Force) स्थापना केलेली असून सचिव (विशेष प्रकल्प) सामान्य प्रशासन विभाग हे कार्यबलाचे सदस्य सचिव आहेत. या कार्यबलाकडे सोपविलेले कामकाज पार पाडण्याकरीता सचिव (विशेष प्रकल्प) यांच्या अधिपत्याखाली नवीन विशेष प्रकल्प कक्ष सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवर स्थापन करण्यास व त्याकरीता खाली दर्शविल्याप्रमाणे अस्थायी पदे निर्माण करण्यास तसेच त्यासाठी येणा-या वार्षिक रु.१२.१२ लक्ष इतक्या आवर्ती खर्चास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | उप सचिव | १२०००-१६५०० | १ |
| २ | कक्ष अधिकारी | ६५००-१०५०० | १ |
| ३ | सहायक | ५५००-९००० | १ |
| ४ | उच्चश्रेणी लघुलेखक | ६५००-१०५०० | १ |
| ५ | शिपाई | २५५०-३२०० | १ |
| | एकूण | | ५ |

२. सदर अस्थायी पदे या शासन निर्णयाच्या दिनांकापासून प्रथमतः ३ वर्षाच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास तसेच सदर पदे वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्ग कक्षामधील उपलब्ध कर्मचारी व अधिका-यांमधूनच भरण्यास मान्यता देत आहे.

३. उपरोक्त पदांच्या वेतन व भत्यावरील खर्च "२०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा (०९०)सचिवालय-(००) (०१) सामान्य प्रशासन विभाग ०१ वेतन - संगणक संकेतांक २०५२००२५-मागणी क्र.ए-४" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २००४-२००५ या आर्थिक वर्षापासून मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

कृ.मा.प.

४.    हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक :२४४/०४/व्यय-४ दिनांक ११.३.२००४ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शैला तारगे-पाटील )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल १ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (कार्यासन क्र. २६ मार्फत)
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग, व्यय -४ /वित्तीय सुधारणा, मंत्रालय,
सचिव (विशेष प्रकल्प) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय
सामान्य प्रशासन विभागातील सर्व सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सामान्य प्रशासन विभाग का.क्र.१९,२५,२६,
निवड नस्ती